स्पर्श ग्रामीण रूग्णालय, सास्तुर, जि. उस्मानाबाद या संस्थेस अनुदान मंजूर करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
**शासन निर्णय क्रमांकः प्राईड-२०१०/ प्र.क्र.९९/ आरोग्य-४**

मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख : ३१ जानेवारी, २०१९.

वाचा :-

**(१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग., क्रमांकः आरएलएच-२७९६/१४५२/प्र.क्र.२४६/ आरोग्य-४, दि.२६.०६.२०००.**

**(२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग., क्रमांकः प्राईड-२०१०/ प्र.क्र.९९/ आरोग्य-४, दि.२३.०९.२०१२.**

**(३) सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये ( राज्यस्तर ), मुंबई यांचे पत्र, क्रमांकः संआसे / टे-२/स्पर्श रुग्णालय/५०६१/१८, दि.१५.०५.२०१८.**

प्रस्तावना :-

स्पर्श ग्रामीण रूग्णालय, सास्तूर, जि. उस्मानाबाद हे रुग्णालय विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून सुरु करण्यास, प्राईड इंडिया या संस्थेस उपरोक्त क्र. (१) येथील दि.२६.०६.२००० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच, त्याअनुषंगाने प्राईड इंडिया या संस्थेस रु.२२.१८ लाख इतके सहाय्य अनुदान अथवा संस्थेने कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते आणि औषधे यावर केलेला खर्च यापैकी जी रक्कम कमी असेल त्या प्रमाणात सहाय्यक अनुदान देण्यास सदर दि.२६.०६.२००० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. तसेच, उपरोक्त क्र. (२) येथील दि.२३.०९.२०१२ च्या शासन निर्णयान्वये, ग्रामीण रुग्णालयासाठी येणाऱ्या खर्चा इतके (रु.५३.०४ लाख) अनुदान किंवा संस्थेने कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते आणि औषधे (रु.४ लाख) व आकस्मिकता खर्च (रु.२ लाख) यापैकी जी रक्कम कमी असेल त्या प्रमाणात सहाय्यक अनुदान देण्यास मान्यता देण्यात आली होती. सदर संस्थेस देण्यात येणारी रक्कम सन २०१२ मध्ये मंजुर केली असल्याने व संस्थेच्या खर्चात आता वाढ झाल्यामुळे संस्थेस प्रतिवर्षी वाढीव अनुदान देण्याची शिफारस, आरोग्य सेवा संचालनालयाने उपरोक्त क्र. (३) येथील दि.१५.०५.२०१८ च्या पत्रान्वये शासनास केली होती. सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :-

स्पर्श ग्रामीण रुग्णालय, सास्तूर, जि. उस्मानाबाद या रुग्णालयास सद्या अनुज्ञेय असलेल्या सहाय्यक अनुदानात रु.७१.९६ लाख इतकी वाढ करण्यास व एकूण रु.१२५.०० लाख इतके सहाय्यक अनुदान दि.१ जानेवारी, २०१९ पासून प्रतिवर्षी देण्यास, उपरोक्त क्र.(१) व (२) येथील दि.२६.०६.२००० व दि.२३.०९.२०१२ च्या शासन निर्णयांमधील अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्रमांक - आर-१, मुख्यलेखाशिर्ष "२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१ - नागरी आरोग्य सेवा - विषम चिकित्सा ग्रामीण आरोग्य सेवा, ११० - रुग्णालये व दवाखाने, ११० (४) - मुफसल रुग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदान, (०३)(०१) अध्यापनेतर रुग्णालये व दवाखाने यांना सहाय्यक अनुदान (२२१० ०१७३), ३१ - सहाय्यक अनुदाने" या लेखाशीर्षांतर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत तरतूद उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर यांच्या अधिनस्त ठेवण्याबाबतची कार्यवाही सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थसंकल्प व प्रशासन ), पुणे यांनी करावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील भाग-पहिला, उपविभाग-तीन मधील अनुक्रमांक ४, परिच्छेद क्र.२७ (२) (ब) अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१३११४५८०७१६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2019.01.31 17:06:32 +05'30'

**प्र.मो.बलकवडे**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ ( लेखा व लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

३. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा ( कुटूंब कल्याण, माता बालसंगोपन व शालेय आरोग्य), पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
५. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), पुणे.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.
८. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, उस्मानाबाद.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, उस्मानाबाद.
१०.प्रकल्प अधिकारी, प्राईड इंडिया स्पर्श ग्रामीण रूग्णालय, सास्तुर, ता.लोहारा, जि.उस्मानाबाद.
११.वित्त विभाग (विनियम), मंत्रालय, मुंबई.
१२.अवर सचिव (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.